**महसूल विभागाच्या विविध कार्यालयांच्या आस्थापनांवरील आकृतीबंधाबाहेरील एकूण ७२२ अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२० ते दिनांक २८/०२/२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१९/प्र.क्र.३१/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ सप्टेंबर, २०२०.

<u>संदर्भ:-</u>

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.संकीर्ण १००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि. २०/०३/२००६.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.प्राफेब २०१०/प्र.क्र.२६/पुनर्बांधणी-३/म-१०, दि. ३०/०७/२०१३
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.उविका-२०१६/प्र.क्र.१५/म-१०, दि. ३०/०४/२०१६ (तीन शासन निर्णय)
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. ईएसटी-२०१७/प्र.क्र.३१/ई-८, दि.२६/०४/२०१७.
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२/०२/२०२०.
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. ईएसटी-२०२०/प्र.क्र.३८/ई-८, दि.०१/०६/२०२०
७) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१/०८/२०२०

<u>प्रस्तावना:-</u>

विभागीय आयुक्त कोकण विभाग, पुणे विभाग, नाशिक विभाग, अमरावती विभाग, औरंगाबाद विभाग, नागपूर विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील विविध क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापनेवरील आकृतीबंधाबाहेरील ७२२ अस्थायी पदांना संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विभागीय आयुक्त कोकण विभाग, पुणे विभाग, नाशिक विभाग, अमरावती विभाग, औरंगाबाद विभाग, नागपूर विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील विविध क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापनेवरील आकृतीबंधाबाहेरील संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामधील ७२२ अस्थायी पदांना **दिनांक १ सप्टेंबर, २०२० ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२१** या कालावधीसाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.३१/८/२०२० रोजीच्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयासोबतच्या संबंधित विवरणपत्रातील रकाना- क्र. ५ मध्ये दर्शविलेल्या लेखाशिर्षाखालील सन २०२०-२१ साठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. **वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.३१/०८/२०२० च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक असल्याचे तसेच यानंतर सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही, याची सर्व विभागांनी नोंद घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे.** त्यानुसार सर्व आस्थापनांनी सुधारित आकृतीबंध तात्काळ प्रशासकीय विभागास सादर करावेत.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१/०८/२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००९२४१६४४५५५८१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3d2bd4ed83b4c722151f75f40dad09e69527159e04d26476bbf5363e7b1c3cb2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=704cb545c50221b15cde7ccb8854e694c765dfb3a0240e891ebfb56ee79e3440, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2020.09.24 16:44:03 +05'30'

**(अजित देशमुख)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त
२) सर्व जिल्हाधिकारी
३) अपर जिल्हाधिकारी, अंबाजोगाई, जिल्हा बीड/मालेगाव, जिल्हा नाशिक/अहेरी, जिल्हा गडचिरोली/जव्हार, जिल्हा पालघर
४) अपर तहसिलदार, पिंपरी- चिंचवड, जिल्हा पुणे/गोंदिया/औरंगाबाद, माथेरान गिरीस्थान (जि. रायगड),धुळे शहर/पिंपळनेर, जिल्हा धुळे/दोंडाईचा ,जि. धुळे
५) प्रशासक, उल्हासनगर शहर वसाहत पुनर्वसन विभाग ( संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत)
६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई /नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९) सहसचिव/उप सचिव, कार्यासन (व्यय-९/आ.पु.क,), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
१०) सह सचिव, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
११) उप जिल्हाधिकारी, मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद.
१२) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.